तृतिय
अंक




काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य





# भक्ती

- महाराष्ट्राचे साहित्यीक




“भक्ती" या ई-पुस्तक रसिकांच्यासाठी सादर करताना अत्यंत आनंद होत आहे...

महाराष्ट्रातील मान्यवर नवकवी हे विविध प्रकारचे लिखाण करीत आहेत, त्यावर त्यांचा अभ्यासही चालू आहे, त्याच्या या प्रयत्नांना हातभार लागावा म्हणून आम्ही ई-बुक साप्ताहिक स्वरुपात त्यांचे साहित्य आपल्यासाठी घेऊन आलो आहोत.. आपल्याला आवडतील अशा प्रकारच्या दर्जेदार काव्यरचना वाचायला मिळतील, याची खात्री आम्ही देतो...

कवी/कवयित्री यांनी ज्या काव्यरचना आम्हाला पाठविण्यात आल्या आहेत त्या त्यांनी स्वतः लिहिलेल्या आहेत, जर कोणाला काव्यरचनेवर आक्षेप असेल तर, त्यांनी bhargavidesign@gmail.com वर आम्हला सूचित करावे..

धन्यवाद,
भार्गवी डिजाईन स्टुडिओ

# भक्ती

कवयित्री



**सौ. जया विनायक घुगे-मुंडे**
परळी वैजनाथ, बीड









काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

मनोभावे भक्ती करु
पंढरीच्या विठोबाची,
आशिषाची झालर मागू
सुखी जीवनाची.....

घोर संकटातून देवा
तारून ने तू आम्हा,
वारकरी भक्त तुझा
व्याकूळ झाला दर्शना...

दूर्लक्ष करू नको
आता तू भगवंता,
संत -थोर नांदले
तुझ्या भक्ती वेदांता...

सार्थ कर त्या विश्वासा
नको रुष्ठ होऊ देवा,
भक्तीमय परंपरेचा
विश्वास तडी न्यावा...

आम्ही सान ,अज्ञानी
सांभाळ तू करावा,
श्वासांत अर्थ आमुच्या
देवा तूच भरावा....

हात जोडूनी काकूळते
जया तुझ्या चरणाशी,
प्रतारणा नको करु
तुझ्या लेकराशी.....

- श्रीम. जया वि. घुगे-मुंडे

# भक्ती

कवी



**श्री. संजय विष्णु जाधव**

शहापूर,जिल्हा - ठाणे








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

भक्ती ही शक्ती जगाची
भक्ती हीच प्रेरणा
करु सारे निरपेक्ष भक्ती
हीच मनी सदभावना

प्रेम भाव भक्तीने
करीतो मी प्रार्थना
राहो मन आनंदी
हीच खरी आराधना

करु जनसेवा सारे
राखूया मानवता
बंधू भाव जागवूया
अखंड ठेवू निरपेक्षता

जात,वर्ण,धर्म,पंथ
भेद सारु या बाजूला
अंतरी असे एकभाव
हाक देऊ या मनाला

प्रेम,भक्ती अन करुणा
राहूदे सदैव अंतरी
भक्तीच्या प्रवाहाचे
आपण सारे वारकरी

- श्री.संजय विष्णु जाधव

# भक्ती

कवयित्री



**सौ. रेणुका पांचाळ**

तालुका वसमत, जिल्हा हिंगोली







काव्य वृंदावन

ई-बुक साहित्य

भक्ती भाव फुलो
आपुल्या अंतरी
देव सदा वसो
हृदय मंदिरी

भक्ती रसामध्ये
गोडी सामावली
हरी जपातुनी
जीवं सुखावली

राम कृष्ण हरी
नामे अनेक ही
एक मुर्ती साचा
दिसे तो मलाही

आम्हा सन्मार्ग दे
येथे जगायला
दुष्ट बुद्धी मिटो
योग्य सुचायला

कर जोडून मी
विणवतो तुला
भक्ती रसातुनी
भरो माझी तुला

- रेणुका पांचाळ

# भक्ती

कवयित्री



**सौ. सरोज सुरेश गाजरे**

भाईंदर

कार्यारंभी वंदन तुजला , करीते मी गजानना
आद्य पुजेचा मान तुझा रे , मान्य असे सकलांना //ध्रृ//

महाराष्ट्र राज्यात प्रसिद्ध तुम्ही, अष्टविनायका
माघ मासी ,वद्य चतुर्थी यावे तुम्ही महानायका
तिलकुंद लाडू मोदक अर्पिते, करुनी वंदना
आद्य पुजेचा मान तुझा रे , मान्य असे सकलांना //1//

भक्त हाकेला सत्वर धावशी, शिवसुता विघ्नेशा
सकल जगाचा कल्पतरु तू , उद्धारक गणेशा
पाना फुलां जळात दिसशी, करीते तुज प्रार्थना
आद्य पुजेचा मान तुझा रे , मान्य असे सकलांना //2//

शब्दब्रह्म तू विद्याधिशा,भूषणास्पद गुणदाता
पार्थिव रुपे पुजतो आम्ही , मंगल कल्याण दाता
मातृपितृ भक्त तुम्ही हो, ब्रह्मांडा घाली प्रदक्षिणा
आद्य पुजेचा मान तुझा रे , मान्य असे सकलांना //3//

मुळारंभ तू , सप्तसूरांचा , चौसष्ट कलाधिपती
मंत्रपुष्पांजली वदे भक्त , अथर्वशीर्ष पठती
महासत्ता होण्या आशिष दे , भारता लोकरंजना
आद्य पुजेचा मान तुझा रे मान्य असे सकलांना //4//

- सौ. सरोज सुरेश गाजरे




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



**सौ. वैभवी मराठे**

बोईसर, जिल्हा पालघर








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

भक्ती तुम्ही आम्ही,
देवाची रोजच करतो....
नतमस्तक होऊनी सारे,
भक्तीभावे मागणे मागतो....

करुनी तुझीच भक्ती,
सदा तुमचीच सेवा....
स्तुतिगीत गाऊनी तुमचे,
आशीर्वाद द्यावा देवा....

भक्तीमय आनंद मिळे,
प्रार्थना आम्हां सर्वांची....
लाभते मनः शांती,
आवड नित्य दर्शनाची....

भक्तीची आस असे,
भक्तीतच आहे शक्ती....
संस्कार घडवूनी जीवनी,
शिकवते ईश्वर भक्ती....

काय सांगावे मनापासून,
भक्तीतच आनंद वाटे....
वातावरण शुद्ध होऊनी,
मनांत प्रेम दाटे....

खरी भक्ती तीच,
करावी मोठ्यांची सेवा....
हाच खरा आजचा,
माणुसकीच्या नात्याचा ठेवा...

- सौ.वैभवी मराठे

# भक्ती

कवी



**प्रसाद धुमाळ**

वाई, सातारा

पंढरपुरात । विठ्ठल सावळा ।।
भक्तीचा सोहळा । पाहू चला ।।

कणाकणात । निराकार हरी ।।
धन्य ती पंढरी । पाहू चला ।।

पाहता सावळा । नुरे देहभान ।।
तो कृपानिधान । पाहू चला ।।

बहुपुण्य थोर । ब्रह्म येई हाता ।।
गुरु कृपा होता ।। पाहू चला ।।

"प्रसादिक" म्हणे । पंढरीचा राजा ।।
पांडुरंग माझा । पाहू चला ।।

- प्रसादिक




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



**सौ.सोनाली जगताप**

मुंबई (बांद्रा)

कधी फुलवावे कधी हसवावे
कधी खोडकर नाद कान्हाचा
गाली रंग हा कसा उडाला
बावरला रंग हा मोरपिसाचा...

निखळ सुंदर रंग मनाचा
तो कान्हाला नाही का दिसला
गोपींसह खोड्यांची रास
कामधंदा सोडूनी भुलला...

विषयात नाही रंग-तरंग
असावे स्वच्छंद बहूरंग
बावऱ्या राधेस नित्य ध्यास
तिला फक्त दिसतो श्रीरंग...

किती मर्म लपला या रंगात
भक्ती रंग दंग दिसे हे रूप
जरी अनयाने बांधली गाठ
पण वरले राधेने हे स्वरुप...

- सौ. सोनाली जगताप



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**श्री. राजीव देशमुख**

मु.पो.अकोला, जिल्हा अकोला

विठ्ठलाच्या भेटिचे स्वप्न चालुन आले,
भक्त हा टाळ मृदंगासह अनवाणी चाले,
ऊन लागता तु धरी आभाळाची सावली,
माझी विठु माऊली,माझी विठु माऊली !!

ओढ दर्शनाची मनी माझ्या दाटली,
जणू तुझी मुर्ती माझी माय वाटली,
रंगुनी रंगात तु भक्तांसाठी धावली,
माझी विठु माऊली,माझी विठु माऊली!!

ओढता संसाराचा गाडा न विसरले नाम तुझे,
संकटात धाऊनी निवारले दुःख माझे,
भक्तांच्या भक्तीला तु पावली,
माझी विठु माऊली,माझी विठु माऊली!!

जग नश्वर हे आस तुच भेटावा,
पाहता दगडास त्यात तु दिसावा,
युगे अठ्ठावीस तु विटेवर उभी राहिली,
माझी विठु माऊली,माझी विठु माऊली!!

– राजीव देशमुख




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



**सौ. वर्षा फटकाळे वराडे**

ठाणे

घेऊनी हरीनाम मुखी
चालतो पंढरीची वारी
विठ्ठल येतो साथीला
कष्ट मिटवीतो सारी

चंद्रभागे तिरी करकटावरी
घातले जरतारी पिवळे पितांबर
जिसे सुंदर रुप, विठ्ठल नामाच्या
जयघोषाने दुमदुमले हे अंबर

वारीमध्ये भक्तांचा
फुगड्यांचा चाले खेळ
ब्रह्मानंदी टाळीचा
घातला सुरेख मेळ

दर्शन घेता विठ्ठलाचे
डोळे भरुनिया येती
नित्यनेमाने माय लेकरु
ते भक्ती रसात न्हाती

शोभे डोईवरी छान
स्त्रियांच्या तुळशीवृंदावन
पाहूनिया भक्तांचा सोहळा
सर्वांचे भरुन येई मन

दु:ख चिंता मिटतील दर्शनाने
मनी लाभेल समाधान
आषाढी कार्तिकी एकादशीला
वारीत आनंदाला येते उधाण

- वर्षा फटकाळे वराडे




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**मयूर बागुल**
उमराने, नाशिक

तुजविण नाही। मला आता कोनी।
तूच आहे मनी । पांडुरंगा।।

विटेवरी उभा । तेजस्वी ते रूप ।
सुंदर स्वरूप। पांडुरंगा।।

सावळा शोभतो। सोनेरी ते रूप ।
मनाला हुरूप । लावुनिया ।।

विठु तुझी भक्ती । मनाला लोभती ।
मन लागे चित्ती । भक्तीध्याना।।

विठू तुझें नाव । घेऊनी ही ओठी ।
मनाची संतुष्टी । मोक्षदायी ।।

-मयुर बागुल



# भक्ती


कवयित्री



**सौ कल्पना सं गायकवाड**

लवादा ता.धारणी(मेलघाट)

जि.अमरावती


माऊली तुला भेटून
सुखावलेल्या मनानी
गाऊ अंतरीचं गाणं
तुझे रुप पाहून पंढरीचे
आले मोहरुन रान

वाट तुझ्या राऊळाची
आली पावले वळून
कितीतरी दिवसांनी
रुप तुझे आले खुलून
तुझ्या दर्शनानी आले
भक्तांचे मन भरुन

विठूनामाच्या गजराने आज
भक्तांगन घरीच झाले दंग
रामकृष्ण हरी रामकृष्ण हरी
भजणाचा अंगणी वाजे मृदंग

**- सौ. कल्पना सं गायकवाड**



# भक्ती

कवयित्री




**सौ. मिरा कुलकर्णी**
पिंपरी चिंचवड, थेरगाव


माझ्या मनीची भक्ती
आणि तुझ्या रे वात्सल्याचा
बोल देवा बोल संगम नाही
अरे बोल देवा बोल संगम होईल का नाही ।।धृ ।।

एकनाथाघरी पाणी तू वाहिले
भर उन्हात देवा रांजण भरीले
श्रीखंड्या होऊनी चंदन उगाळीले की नाही
बोल देवा बोल संगम होईल का नाही ।।1।।

नामदेवाच्या रे श्रद्धे पोटी
जेवलास देवा भक्तीसाठी
जनाबाई साठी दळण दळीलेस की नाही
बोल देवा बोल संगम होईल का नाही ।।2।।

तुकारामाची अभंग गाथा
इंद्रायणीतूनी काढलीस नाथा
तुकोबाला सदेह स्वर्गी नेलेस की नाही
बोल देवा बोल संगम होईल का नाही ।।3।।

कान्होपात्रेला गुप्त करीशी
मिरेसाठी देवा विष प्राशीशी
दामाजीची हुंडी पटविण्या गेलास की नाही
बोल देवा बोल संगम होईल का नाही ।।4।।

माझी नाही रे योग्यता इतुकी
मी असेल जरी महापातकी
एकदा तरी दर्शन मजला देशील का नाही
बोल देवा बोल संगम होईल का नाही
अरे बोल देवा बोल संगम होईल का नाही ।। 5।।

- सौ. मिरा कुलकर्णी





काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी




**सुशांत संतोष शिंदे**

यवतमाळ









काव्य वृंदावन

ई-बुक साहित्य


जन्मा आला मानव देही छंद नाही नामाचा
ध्यानी-मनी देव नसता जन्म कोणत्या कामाचा

मोह-मायेच्या रंगणी रंगला तू जन्म भरी
देव त्यागूनि चित्तातून स्वार्थी धरिलेसी उरी

आत्मा दिला  ज्याने तो परमात्मा त्यात नाही
नाही धन नामाचे जिथे ती कसलि रे कमाई

कान,नाक,डोळे सर्व आहे नीट तुझे
माय बापाच्या पुण्याला बक्षीस ईश्वराचे

स्वार्थी नात्यास धरुनि ठेवतो कराला
तया परी  हृदयात ठेव ईश्वराला

नाम स्मरता संचारिते चेतना उरी
नाम ईश्वराचे शास्त्र वेदांपरी

- सुशांत संतोष शिंदे

# भक्ती

कवयित्री



सौ.भारती राजू लखमापूरे
वरोरा , जिल्हा-चंद्रपूर

अत्रि अनसूया । बीज प्रकटिले।
सुपुत्र लाभले । देवदत्त।।

विष्णू अवतार । तीन अंशरुप।
योग ध्यान तप। त्रिगुणात्मक ।।

अंगा भस्म पट्टे । रुद्राक्षाच्या माळा।
शोभतसे गळा । अवधूत।।

म्होर चार कुत्री। वेद चार तव ।
शंकरा भैरव । मानतसी ।।

औदुंबर वृक्षा । बसती ध्यानस्थ ।
योग मार्गस्थ । दत्तात्रेय ।।

दत्त नामस्मरण । लाभी सुख शांती ।
संकटातून मुक्ती । प्रसन्नता ।।

या गुरु चरणी । ठेवी भाव थेट ।
आपोआप भेट । औदुंबर ।।

वारकऱ्यांनाही । पुज्यनिय आहे।
वंदनीय आहे । गुरुदेव ।।

त्रिमुखी देवता । दत्त संप्रदाय।
मंत्र हा जपाय । दिगंबरा ।।

भारती वाहती । पुष्प,बेलपत्ती ।
सदैव जपती । दत्तनाम ।।

- सौ.भारती राजू लखमापूरे




काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**राजेंद्र उदारे**

पाथर्डी . जि. अहमदनगर







काव्य वृंदावन

ई-बुक साहित्य

सांग रे तुझ्या देवांना
माझा देश संकटात
आता कृपा करा ना
हे माणसा तू ....   ॥ धृ ॥

भूकेल्याला अन्न दे
तहानलेल्यास पाणी
निरोगी ठेव प्रजा सारी
हिच माझी विणवणी
हे माणसा तू....   ॥ 1 ॥

मृत्यू दंड बास रे
शिलगती सदा स्मशानं
निसर्गाचा समतोल मी
राखण्याची खातो आनं
हे माणसा तू .....   ॥ 2 ॥

क्षणभंगुर हे जिवन रे
दान करु दोन्ही हाताने
बॅनर बाजी नाही करणार
सगळ्याशी वागू प्रेमाने
हे माणसा तू ....   ॥ 3 ॥

देवा तुम्ही रस्त्यावर रे
डॉक्टर पोलीस रुप तुझे
सफाई कामगार ही तुच
भक्ती करतो ऐक ना माझे
हे माणसा तू ....   ॥ 4 ॥

राजेंद्र उदारे

# भक्ती

कवी



**श्री. विशाल एस. नवले**
रा.नांदुरा जि. बुलढाणा








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

न्हाऊ शंकर भजनी
होऊ भक्तीमधी दंग
टाळ चिपळ्या संगती ;
गाऊ स्वामींचा अभंग ।। 1।।

नाम निराळा शंकर
मधु गोड स्वामी नाम
स्वामी चरणा जवळी
असे काशी मोक्ष धाम ।। 2।।

घेऊ सार्थक करुनी
जन्म आपुला नश्वर
ब्रम्हांडाचे अधिपती ;
स्वामी शंकर ईश्वर ।।3।।

आदी अनंत स्वामींचा
आहे महिमा अपार
स्वामी सगुण साकार
करी जीवनाचे सारं ।। 4।।

स्वामी चरण कमळी
श्रद्धा सुमन अर्पूया
करा स्वीकार नमन
सद्गुरु स्वामीराया ।।5।।

विशाल एस. नवले “स्वामीदास”

# भक्ती

कवयित्री



**सौ. दिपाली दिलीप पिंपळे**

ता.जि.पालघर

विठ्ठला तू माझी माऊली
पित्यापरि प्रेमळ साऊली ||ध्रु||

नाही पाहिली तुझी पंढरी,
तरी मूर्ती वसे अंतरी
येते आता तुझ्या शरणी,
डोळे लागले तुझ्या चरणी ||1||

वाळवंटी वारकरी मेळा,
तिथे खेळतोस फुगडीच्या खेळा
भक्तांचा लागे तुला असा लळा,
बाप आमुचा रे तू लेकूरवाळा ||2||

स्त्री पुरुष भेदभाव नाही
तुझ्या नामाचे वारे सदा वाही
दूर्बलांचा दास तूच होई
भक्तांचा भार डोईवरी वाही ||3||

तूच आहेस माझा पांडुरंग,
सदा लाभावा मला तुझा संग
तुझ्या नामात होऊन मी दंग,
तुझ्या पायाशी झाले एक रंग ||4||

सौ.दिपाली दिलीप पिंपळे



# भक्ती

कवी



**श्री. अरविंद कुळकर्णी**
मलकापूर

भोग भक्तीचा देवा तुला
देतो शुद्ध अंतःकरणाने
गोड मानून घ्यावा तो
आपण मोठ्या मनाने

सुदाम्याचे पोहे खाल्ले
त्यात होता भोळा भाव
कुठेही असला तरी सदैव
भक्ताच्या हृदयात तुझा

ठाव शबरीची उष्टी बोरे श्रीरामा
खूप आनंदाने स्वीकारली
शबरी मातेने तुझ्या दर्शनाने
आनंदाश्रुंना वाट करून दिली

भक्त प्रल्हादाच्या हाकेसाठी
खांबातून झालास तु प्रकट
आमच्याही हाकेला दे साद
परिस्थिती आली तशी बिकट

भोग भक्तीचा महिमा कधी
सांगता येणार नाही शब्दात
प्रभुंशी नाते असावे लागते
पण असावे ते  प्रारब्धात

अरविंद कुळकर्णी




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



**सौ. करिश्मा महेश डोंगरे**
पंढरपूर




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

सुनी सुनी आहे तुझी पंढरी विठ्ठला
चुकतेय ही सारथी पंढरीची वारी
नाही फुलत आता भक्तीचा मळा
हळहळून जाते सारे वारकरी.

टाळ,चिपळ्या,मृदुंग
सारे आसुसलेत तुझ्यासाठी
ओढ लागली तुझ्या भजनाची
अपुरीच राहतेय भक्ती तुझी.

मनात तुच आहेस पांडुरंगा
तोंडात तुझाच आहे अभंग
आस लागली आता वेडी
कधी होनार सारे कीर्तनात दंग.

तुच विठोबा माऊली आमची
तुच मायेची सावली आमची
चंद्रभागाही आज पाहतेय रे
माऊलीच्या संदर त्या पालखीची.

अडानी ही आहे रे भक्ती
जातात शोधाया तुला मंदीरी
वैकुंठाचा आहेस रे तु राजा
पाई-पाई करतात रे वारी

तुझ्या दर्शनाची लागली आस
देवा मी हात जोडते घरच्याघरी
जीव झालाय कसा वेडापीसा
दूर लवकर कर रे ही महामारी.

करिश्मा महेश डोंगरे

# भक्ती

कवयित्री



**सौ.अर्चना सुनिल घळके**
बार्शी, सोलापूर

तुझ्या भक्तीत जीव रंगला
टाळ विण्यात देह दंगला ॥धृ॥
ओठी नाम तुझे, पुण्य साजिरे
सावळे सुंदर, रूप गोजिरे
अंतरंगात ... तुच गुंतला
टाळ विण्यात देह दंगला ॥1॥

किर्ती ही अशी, साऱ्या अंबरी
मायेची छाया, गगनापरी
संकटात साथीला.... तुच थांब
लाटाळ विण्यात देह दंगला ॥2॥

न्यायाचा निवाडा,आहे तुझ्या दारी
सदैव तुझी कृपा,या भक्तावरी
मुखी नाम ज्याच्या....तोची जिंकला
टाळ विण्यात देह दंगला ॥3॥

नवविधा भक्ती,पुजनी अर्चनी
मान-अपमान हा,जातो गळुनी
भक्तीचा सडा.... मनी शिंपला
टाळ विण्यात देह दंगला ॥4॥

पाण्यावरी तु ,तारली कशी गाथा
चरणी तुझ्या मी, टेकविला माथा
संगतीत संतांच्या.... भाव गुंगला
टाळ विण्यात देह दंगला ॥5॥

सौ.अर्चना सुनिल घळके




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती


कवयित्री



**सौ.सविता मुनोत**

कुकाणा, अहमदनगर


भक्त असावा तर हनुमानपरीस
भक्ती त्याची जगावेगळी
वनवास तर रामास झाला पण
घरदार परिवार सोडूनी रामसाठी धावला

हृदयात बसवले रामास
संजीवनी बुटी शोधून आणण्यासाठी
पार केली अनेक संकटे
रामसीतेस मानले मात्यापित्याहून अनमोल

तुझी काय ती भक्ती तुझी काय ती शक्ती
कसं जमलं तुला एवढे सांग गड्या
काढल्या तुझ्या अनेक लोकांनी खोड्या
पण तू सर्वांचे मन जिंकलेस गड्या

तुझी काय ती भक्ती तुझी काय ती शक्ती
पाहूनी गहिवरले माझे मन
तुझ्या या भक्तीने जिंकलेस तू सर्वांचे मन

सौ.सविता मुनोत



# भक्ती

कवी



**योगेश वाल्मिक देवरे**
देवळाणा (संभाजीनगर)







लागो छंद जीवा,
तुझ्या भक्तीत राहू
पांडुरंगा तुला रे,
डोळे भरुन पाहू...

वेड्या या भक्ताच्या
मनी लागो ध्यास तुझा,
सदैव असुदे डोईवर
पांडुरंगा हात रे तुझा...

निरंतर राहू दे गा
नाम तुझे या मुखी
याच जन्मी होये सुखी
भक्ती करून मी तुझी...

मन असो नेहमी
तुझ्याच रे भजनी..
तूच माझा बाप अण्
तूच माझी जननी...
पांडुरंग पांडुरंग...

योगेश वाल्मिक देवरे

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती


कवयित्री



**सौ. सारिका सुहास वाणी**
घणसोली, नवी मुंबई


भक्ती हा राजमार्ग स्विकार
होई ईश्वर साक्षात्कार ||धृ||

करता प्रभूचे नित्य स्मरण
खुले भक्तीचे हो दालन
घे नामाचा आधार ||1||

भजनासमयी उठती तरंग
तोच भक्तीचा भावरंग
भावगीत स्वर झंकार ||2||

व्यवहारातही जप तू निती
होईल उच्च परमभक्ती
नको धर्माचा व्यापार ||3||

निरपेक्ष प्रेम, निस्वार्थ सेवा
अनुभव भक्तीचा गोडवा
हृदयी आनंदी चित्कार ||4||

स्वादात भक्ती , नादात भक्ती
कर्मात भक्ती , हृदयात भक्ती
भक्त ईश्वरी अवतार ||5||

ना निराळी ना कठीण ही भक्ती
हे तर प्रेम ईश्वराप्रती
कर जन्माचा उद्धार ||6||

सारुमन





काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



सौ.रोहिणी टाकळकर जोशी

मनी चिरंतन ध्यास हवा असा
श्रीराम चरणी विश्वास तो जसा...
मन मना सवे खास दृढ नाते
श्वास नाम घेते नाममय गाते...

वसे हृदयी हे कोणी, कुठेही घ्या
मनी ठसले हे श्रीराम नाम घ्या...
कमल नयनी शांत सुखावते
स्मित हास्य ओठी नेत्र खुळावते...

पराक्रमी पुत्र धर्नुधारी राम
रघुकुल शान चैतन्याचे धाम...
अवघड वेळी ते पितृवचन
पाळूनी काननी श्रीरघुनंदन....

दुःख हे पित्याचे सरे क्षणभर
शाप ते ऋषीचे हे जिवनभर ...
पुत्र वियोगाचे दुःख ते समोर
राजा दशरथा कर्मगती थोर,...

देव आले घरी हाती भाग्यरेखा
कर्म घडतसे जसे लेखाजोखा...
भक्ती हे शिकवी कर्तव्यपुर्तता
लिन पदी सदा ही समर्पितता...

सौ.रोहिणी टाकळकर जोशी



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



**सौ. संगीता महाजन**

जळगाव

भक्ती हनुमानाची रामाप्रती
मित्र सुदामाची कृष्णाप्रती
सावता माळीची विठ्ठलात
नामदेव,तुकोबा,ज्ञानोबा संत.1

साक्षात अवतरले भुलोकी
नित्य भक्तीच्या भावरंगात
निरपेक्ष प्रेम नामस्मरणात
जपत भक्तीमहिमा आनंदीत..2

प्रल्हादाची,ध्रुवाची नारायणात
श्रावणाची भक्ती मातापितात
जनाबाई ,मुक्ताई, मिराबाई
राधेकृष्ण प्रेमभक्ती गीत गाई..3

जीवनात मिळे आधार प्रभुचा
निस्वार्थी सत्कर्म परमभक्तीत
मधुर वाणीत हदयात सदा भक्ती
विश्वास,हिंमत जगण्याची शक्ती...4

निर्मलभक्ती माझी परमेश्वरावर
चैतन्य तरंगे वाहे अंत:करणातून
शब्दपुष्प भक्तीने विचाराने प्रकटे
माझ्या काव्य लिखाणात ते उमटे..5

प्रेमभक्तीचे आगळंवेगळं नातं
प्रकाशित अदृश्य परमात्माशी
नश्वर असे शरीर सुक्ष्म चेतनाशी
जन्माचा उद्धार अमर आत्माशी..6

**संगीता महाजन**




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



सौ. शरयु पाम्पट्टीवार
दिग्रस, यवतमाळ





मनाच्या गाभाऱ्यात
करता भक्ती
उमटे नाद
लाभते दिव्य शक्ती....

हृदयी असो शुद्ध
निर्मळ भाव
मिळते शांती
घेता हरीचे नाव....

मनमंदिरी सदा
व्हावा गजर
मुखी सदैव
हरीनामास  स्मर....

प्रभूभक्तीत होता
मन तल्लीन
येई शुद्धता
विचारात मलीन....

नसावा मनी मोह
माया आसक्ती
निष्काम कर्म
अशीच करा भक्ती....

निर्विकारता मनी
अपार प्रिती
मिळे सिद्धता
असेल त्यागनीती...

सौ.शरयु पाम्पट्टीवार



# भक्ती

कवयित्री



**कु.भाग्या पांडुरंग कारंडे लक्ष्मी**
सोलापूर

स्मरले नित्यनेमे तुज मी । आजवरी घडले मी ।
संस्कृतीचा वारसा । चालविण्या सदा तत्पर मी ॥

तुज भक्तीचाच ठेवा । मज मनी लागी लळा ।
सूर अभंगाचे नित्य गाते । मी माझिया गळा ॥

भक्तीत होता विलीन । अंतरीचा देह स्मरीन ।
नाम तुझे घेता मुखी । मज होई मनी समाधान ॥

विटाळली दुनिया माझी । नाम नाही मुखी कुणाच्या ।
मागणे हेची आता मनी । स्मरावा तू गहाळ देहाच्या ॥

सत्ययुगाची प्रचिती । तुझ्या भक्तीने सर्वा घडावी ।
टाळ मृदुंगाने माझी । उभी दुनिया गुणगुणावी ॥

भाग्यलेखा




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी




**मल्हारी राख**

कोनोशी, शेवगाव, अहमदनगर.








काव्य वृंदावन

ई-बुक साहित्य




नाम तुझे मुखी । असो देवा सदा
कारणे आनंदा । माझ्या तूच ॥

असो साथ तूझी । एकट्या या जिवा
तुज विन देवा । नाही कुणी ॥

निरंतर वेड । लागो मज तुझे
मजपाशी माझे । नाही काही ॥

मनोहर रूप । पाहावे एकदा
भेटावे कैकदा । विठू तुज ॥

धन्य होईल मी । पाहे जेव्हा तुज
जपे नाम रोज । विठू तुझे ॥

मल्हारी राख

# भक्ती

कवयित्री



**लक्ष्मी रेड्डी**
पुणे

मुकुट शिरावर कटि पीतांबर
वीर वेष तो श्याम मनोहर
दुर्जनांचा नाश करून तो..
आदर्श प्रस्थापित करणारे श्रीराम..!

राम ज्यांचे नाव आहे
आयोध्या ज्यांचे गाव आहे
असावा हा सुंदर रघुनंदन..
आम्हास सदर वंदनीय आहे..!

ज्यांच्या मना मनात श्रीराम
त्यांच्या भाग्यात वैकुंठधाम
प्रभू रामचंद्राचे सर्जनशीलता..
पुन्हा जन्माला यावे श्रीराम..!

सितेला रावणाने लंकेत पळवून नेले
सीता वनवासी श्रीरामा साठी आली
ऋषीमुनी ची रक्षणाची प्रतीक्षा केली सीतेने..
श्रीराम रुपाने श्रेयास आली..!

रामासाठी सीतेवर केले अपहरण
रावणाने सीतेला लंकेस लुबाडून
नंतर शरण गेला रावण रामास..
धन्य झाले ते श्रीकृष्ण व श्री राम..!

लक्ष्मी रेड्डी



# भक्ती

कवी



**कवी सरकार इंगळी**

ता हातकणंगले जि कोल्हापूर

पंचगंगेच्या तिरी ,दत्त मंदिरी
सजळा सोहळा, भक्त झाले गोळा....।।धृ।।

पुर्वेला सूर्य नारायन,उगवला
किरणांचे लोटांगण, दत्त चरणाला
भजनात दंग,भक्तजन सगळा.......।।1।।

महिमा मोठा देव,गुरुदत्तांचा
किर्ती त्यांची, घाट पवित्र गंगेचा
पुणवेला जमतो ,भक्तांचा हो मेळा......।।2।।

त्रिमूर्ती सुंदर ध्यान, रुप छान
भक्त पाहे रुप, डोळा भरुनं
मनोभावे लिन होतो,भक्त भोळा.....।।3।।

इंगळी गावी रक्षण करता देव
पुजाअर्चा चाले रोज, भक्तीभाव
दुर्वा कापूर, मंदिरी भक्तीची सोहळा......।।4।।
दक्षिण काशी , इंगळी पंढरपूर
गुरुदत्तांचा,सदा असे वावर
गुरुनामाचा रोज, फुलतो मळा ........।।5।।

भजन किर्तनात भक्त दंग
एकरूप सारे,येई भक्तीत रंग
महिमा दत्ताचा, सजतो सोहळा......।।6।।

कवी सरकार इंगळी




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी




**माणिक उ. सोनवणे**

रा.ता.सोयगाव, जि. औरंगाबाद








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

बाबा पीर सयलानी
दाता माय बाप झाले ...!
मज देऊन पदर
लई उपकार केले ...!!

मला नव्हता कुणाचा
दु:ख आसऱ्यात साथ ...!
मज करुणेची हाक
तुझ्या पडली कानात ...!!

अश्रू पापणीत चिंब
खेळे देहात दु:खणं...!
तुझ्या चौकटीचे दार
झाले औषधाचे गुणं...!!

रुप पापण्याच्या आड
तुला स्मरत बसतो ...!
मन तनाच्या दोघात
कुणी तिसरा नसतो ...!!

तुझ्या रमतो नामात
मुखी गातो गुणगान ...!
नित्य तुझ्याच भक्तीत
मन देह झाले दान...!!

तुझ्या चरणाच्या काठी
माझं बांधलं माहेर ...!
जीव आला दारावर
आता करु नको दूर ...!!

माणिक उ. सोनवणे

# भक्ती

कवयित्री



**सौ. अंजली उत्तरवार**

चंद्रपूर

"म्हणे मी, ' दाव देवा चमत्कार तूझा,
मग होईल तूझा मी  भक्त'
देव म्हणतो कसा, 'चमत्कार दिसेल तेव्हाच
जेव्हा होशील भक्त तू सशक्त"

"भक्तीच असे खरी किल्ली
माझ्या मनाचा ठाव घेण्याची....
विसरु नकोस शिकवण, फळाची
अपेक्षा न करता कर्म करण्याची

"रसात भक्तीच्या डुंबता
सुखाला पारावर नाही राहणार
होशील एक रूप माझ्याशी, मग
चमत्काराची गरज नाही उरणार

"श्री राम-राम, विठ्ठल-विठ्ठल,
श्री हरी-हरी, शिव-शिव नाम जपता जपता
प्रल्हाद होईल तूझा, नकळत,
भक्तीची माळ जगता -जगता'

गितांजलीज् पोएट्री




काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**सौरभ हिरामण आहेर**

तिसगाव, नाशिक








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

हाक देतो पांडुरंगा ,
धाव धाव तु विठाई ..
होऊ दे गं नवलाई ,
मला कुशीत घे आई ..

विठु श्वास विठु ध्यास ,
विठु भक्तीची आरास...
भुकेलेल्या जीवासाठी ,
विठु अमृताचा घास ..

दास तुझा झालो देवा ,
हेच तुझे ऋृण आहे
तुजविण पांडुरंगा ,
मज तरी कोण आहे ..

माझी येवु द्यावी दया
किती काकुळती यावं ...
सोडुनीया देह आज
तुझ्या पायी लीन व्हावं ...

माझे अस्थी विसर्जन ,
चंद्रभागे मध्ये व्हावे ..
जन्मोजन्मी या देहाने
नाम विठोबाचे गावे ..

जन्मभर मायबापा ,
वारी तुझीच चालेल ..
सरणाची राख माझी ,
विठु विठुच बोलेल ..

**सौरभ हिरामण आहेर**

# भक्ती

कवी



**चि. अक्षय चरण सितापुरे**

अहमदनगर








काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

आराधना करुनी गजानना,
नतमस्तक तुजला होऊया.
प्रथम वंदूनी हे गणराया,
गुणगान तुझेच गाऊया..

आतुर मन तुझे रूप पाहण्या,
चालतो मी पावलो पावली..
शुभारंभ तुझ्या पूजनेने होई,
आम्हा भक्तांची तू सावली..

तू एकदंत, तू विघ्नहर्ता,
तू विद्याकलांचा अधिपती..
लंबोदर तू, मोरया ही तू,
तूच अमुचा बाप्पा गणपती..

अगाध लीला,प्रघात महिमा,
असंख्य रूपास वंदन करितो.
महती तुझी या जगातली,
मोरया मोदक तुलाच मी वाहतो..

शिवपार्वतीच्या पुत्रा,रूप तुझे अनंत,
गात महिमा तुझा शरण तुला मी जातो.
हे अष्टविनायका नाम तुझे घेता ओठी,
अहंकार तुझ्याच चरणी वाहतो..

तुझी कृपा दृष्टी ठेव आम्हावर,
आज हीच विनंती तुला करतो.
उद्धार कर सर्वांचाच तू देवा,
इतकीच भीक आज मी तुला मागतो.

चि. अक्षय चरण सितापुरे

# भक्ती

कवी



**गोविंद श्रीमंगल**

लातूर





तुझ्या भक्तीत देवा
मी झालो लिन
बहु उपकार तुझे
माझे सुखी जीने!!1!!

मला ना कुनाचा
नाही रे आधार
तुझ्या भक्ती साठी
आहे मी बेजार!!2!!

पांडुरंग तुझी भक्ती
आहे माझ्या ध्याणी
तुच माझ्या ध्याणी
तुच माझ्या मनणी!!3!!

तुझ्या दरबारी देवा
येतो रे सतत
चंद्र भागेच्या तीरात
स्नानरे करत!!4!!

रुप तुझे सावळे
गोजिरे गोमटे
गळ्यात तुळशी माळा
चंदन रे उटे!!5!!

गोविंद श्रीमंगल



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



सिद्धेश राजाराम पाटील

कोल्हापूर







काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

तुझे नाम घेत देवा
भक्तीत विलीन झालो,
पण न भेटताच तुला
फक्त बघून मी आलो..

भेट झाली तुझी माझी
क्षणात माझ्या जन्मानंतर,
पण जन्मा आधीच होते
फक्त एका नाळेचे अंतर..

नास्तिक आस्तिक करून
भांडतात रे इथं लोकं,
पण तू ही कसा देव आहे
समुजवत नाहीस त्यांची भोकं..

तुझे नाम न घेणार्यां
नामी देवा आस्तिक मानतो,
कारण ते मायबापास पूजतात
हे मी चांगलेच जाणतो..

दिवसरात्र तुझी भक्ती देवा
माझी आईही खूप करते,
पण सगळी शक्ती मला देऊन
शेवटी मात्र तीच आधी मरते..

आता एकच मागणे आहे माझे देवा
की तुझी भक्ती आधी करून घेऊ नको,
आईवडिलांना जेवण दिल्याशिवाय
नवराबायकोला जेवू देऊ नको..!!

सिद्धेश राजाराम पाटील

# भक्ती

कवयित्री



**सौ.मनिषा दिपक सामनेरकर**

पालघर

गौरीनंदना तुज पहिले वंदन
जय जय बाप्पा जय ,जय गणराया।।धृ।।

भाळी कुंकम टिळा सुपासारखे कान
तुझ्या पुजेला पान,फुलं दुर्वांचा मान
जय जय बाप्पा जय,जय गणराया//1//

बसायला तुला असे मुषकाची स्वारी
पायी रुणझुण घुंगरमाळा दिसे बहू न्यारी
जय जय बाप्पा जय ,जय गणराया//2//

मोदकांचा देते तुझ मनोभावे प्रसाद
सोबतीला घे तू लाडवांचा आस्वाद
जय जय बाप्पा जय,जय गणराया//3//

अग्रपुजेचा आहे रे तूच अधिकारी
आम्हां पामरांना बाप्पा तूच तारी
जय जय बाप्पा जय,जय गणराया//4//

कोरोना विषाणूचा आता तुच संहारकर्ता
मनोभावे आराधना करते तुज विघ्नहर्ता
जय जय बाप्पा जय,जय गणराया//5//

सौ.मनिषा दिपक सामनेरकर




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



सौ.वृन्दा दीपक राव
धुळे

कशी होऊ कृतज्ञ देवा,कशी होऊ उतराई
भरभरुन दिले किती ,शब्द मजकडे नाही।।धृ।।

शुभ उषःकाली पूर्वेला तेजोनिधी नित येई
गात जागविती भाट तुझे रे पक्षीगान होई
कृपेने उजळे जीवन मन तेजोमय होई
भरभरुन दिले किती,शब्द मजकडे नाही।।1।।

बरसती जलधारा आभाळाच्या कलशातून
बहरती रंगातली फळे फुले हिरवाईतून
सागर गाजातून सुरावट गूढ गीत गाई
भरभरुन दिले किती,शब्द मजकडे नाही।।2।।

गडद अंधाराची काळीशार ओढूनी दुलई
अवनीच्या अंकावरी रात्रकवेत झोप येई
तनमनाला दे विश्रांती, तृप्त समाधानी होई
भरभरुन दिले किती,शब्द मजकडे नाही।।3।।

सौ.वृन्दा दीपक राव



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**आकाश वाल्मीक जाधव**

चंदनपुरी, ता. नांदगाव, नाशिक





पहाटेच्या प्रहरला
जागे झालंय मंदिर
झाली काकडा आरती
हरी नामाचा जागर

मनोभावे वारकरी
नाम देवाचे जपतो
ओवाळून भक्तिभावे
त्याचे चरण पुजतो

टाळ मृदुंग वाजले
तृप्त झाले जिव्हा, कान
नाद घुमला शिवारी
जागे झाले तन - मन

आशा तृष्णा मोह माया
गेल्या भक्तीत वाहून
दैत्य - दानव पळाले
जीव मुठीत घेऊन

गाता मुखी एक नाम
कामक्रोध झाले नष्ट
रामकृष्ण वासुदेव
नाम हेच सर्वश्रेष्ठ !

**आकाश वाल्मीक जाधव**




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**श्री सुरेश डवरी**
का तारळे, ता राधानगरी

तीन शिरे एक मान दत्ता तुला
तीन शिरे एक मान॥ धृ॥

दत्ताच्या भोवती गायींचा मेळा
मेळा किती दिसें छान
दत्ता तुला तीन शिरे एक मान॥1॥

दत्ताच्या भोवती श्वानांचा मेळा
मेळा किती दिसें छान
दत्ता तुला तीन शिरे एक मान॥2॥

दत्ताच्या हाती उभा त्रिशूळ
त्रिशूळ दिसे किती छान
दत्ता तुला तिन शिरे एक मान॥3॥

दत्ताच्या हाती एक कमंडलू
कमंडलू दिसे किती छान
दत्ता तुला तिन शिरे एक मान॥4॥

दत्ताच्या हाती वाजे डमरू
डमरु दिसे किती छान
दत्ता तुला तीन शिरे एक मान॥ 5॥

दत्त दिगंबर दत्त दिगंबर
दत्ताचे करावे ध्यान
दत्ता तुला तीन शिरे एक मान॥6॥

श्री सुरेश डवरी




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# भक्ती

कवी



**स्वप्नील वालम**

लागली आस मला पंढरीत येण्याची
तुझ्या चरणी माथा टेकून दर्शन घेण्याची
येतो येतो म्हणून अनेक वर्षे सरली
तुला भेटाया माझी पुण्य नाहीका भरली

कस्तुरी टिळा कपाळावर लावून राहिलाय
तुळशीची माळ घालून आशीर्वाद द्यायलाय
ऐकून तुझं रुप माझ्या मणी मी ठरवलंय
म्हणे विठेवर उभाराहून कमरेवर हात तू धरलंय

तुझ्या वारीची कल्पना आहे खूप न्यारी
हाती टाळ, गळ्यात मृदुंग, कीर्तनाची मांदियाळी
चंद्रभागेतीरी होई वैष्णवांची स्वारी
या संकटाच्या काळात देवा होईल का तुझी वारी

तूच सांग विठुराया कधी होईल माझी वारी
माझ्या जीवनाची तुझ्याच हाती आहेरे दोरी
आजपर्यंत देवा मी तुला माणसातच पाहिलंय
पंढरपुरात येऊन मात्र तुझं दर्शन घ्यायचं राहिलंय.

स्वप्नील वालम



# भक्ती

कवी



**श्री सागर डवरी**
विरार,मुंबई







काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

राम जन्मले हो राम जन्मले
अयोधेमधे आज राम जन्मले
अयोध्यानगर आज आनंदले
अयोधेमधे आज राम जन्मले

हो पहाट नवी नव्याने बघा आज जाहली
हो पाखरांच्या ओठी नवी गीत ही आली
सगळीकडे आज पहा चित्र बदलले
अयोध्यानगरीत आज राम जन्मले
राम जन्मले हो राम जन्मले
अयोधेमधे आज राम जन्मले हो हो हो हो

चैत्रशुद्ध - नवमीला,अयोधेत अवतरला
धर्मरक्षक,कर्तव्यदक्ष रामप्रभू येथे जन्मला
हो राजा दशरथ किती हो खूष दिसू लागला
माता कौशल्या आनंदे डोई धारा वाहिल्या..
राम जन्मले हो राम जन्मले
अयोधेमधे आज राम जन्मले हो हो हो

वंदनीय,आदरणिय पवणपुत्र भक्त लाभले
लक्मण, शत्रूघ्न, भरत ऐसे भाऊ भेटले..
हो हो राम पती सीतेस एकवचनी भेटले
हो...अयोध्या सोडून वनवासी चालले.

राम जन्मले हो राम जन्मले
अयोधेमधे ऐसे राम जन्मले
राम जन्मले आज राम जन्मले
धर्म रक्षनारे पहा राम जन्मले हो हो हो

प्रेमकवी सागर डवरी

(चाल:- याड लागल ग याड लागल ग)

# भक्ती

कवी




**सिध्देश रेखा दिलीप उतेकर**

वावे तर्फे खेड, जांभूळ वाडी










काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य


देवा तुझे मी
गुण हे गाईन
तुझ्या पंढरीला
चालत मी येईन

पायी दर्शना देवा
तुझ्या मी आलोय रे
जन्मा येवुन तुझा
मी भक्त झालोय रे

देवा तु पावशिल
रे माझ्या नवसाला
देवा तु धवशिल रे
माझ्या हाकेला

तु वसला आज
चंद्रभागेच्या काठाला
मी तुला प्रत्येक
वारीला येतो भेटाला

आतुर झालो भेटण्या
दर्शन मला आज दे
मीच तुझा भक्त रे
मला तू कुशीत घे

चंद्रभागेच्या पाण्यात
तुझ्या रुपाने नाहलो
तुझे घेऊनि दर्शन देवा
धन्य धन्य झालो

सिध्देश रेखा दिलीप उतेकर

# भक्ती

कवी



**प्रथमेश तायडे**
खारघर, नवी मुंबई







काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

छंद लागला भक्तीचा तुझिया
विसरलो माझे भान रे
एकटक पाहुनी करितो विचार
नेमके काय तुझे नाव रे

कधी येता मंदिर कृष्ण होतोस
कधी होतोस तू महाकाल रे
भक्तांसाठी आहेस तू एकच
नेमके काय तुझे नाव रे

येशू बनुनी जगा मार्ग दविलास
पैगंबर बनुनी दिलास पैगाम रे
कुठे गेलास तू बुद्ध बनून
नेमके काय तुझे नाव रे

भक्ती कराया सर्व बापुडे
धरतात तुझी वाट रे
नाम जपाची ओढ सर्वांना
सांग काय तुझे नाव रे

प्रथमेश तायडे

# भक्ती

कवी




**साहेबराव गंगाराम पवार**

ता. चांदवड जि. नाशिक


काव्या ढगा विनवतो
येरे येरे   त्यांच्या शेता
कैक दिस झाले तुला
रुसू नकोस रे आता..!

मायबाप राबत्याती
रोज मरणं कांडून
रोज शेतीमातीसाठी
काव्या आभ्राला भांडून..!

तडा गेलं  जमीनीला
तहानेने ती  व्याकूळ
आस लावून  बसली
एकएक ते ढेकूळ ..!

माती भक्तीत रे लीन
वृद्ध आईबाबा माझी
धारा घामाच्या वाहती
पोसतोय जीव तुझी..!

मज पडलाय प्रश्न !
जगा पोशिंद्या म्हणती ?
अन्नदान सेवा रोज
मायबाप रे करती..!

मातृभूमी त्यांच्यासाठी
आहे जीव की रे  प्राण
सूर्यचंद्रावाणी नित्य
ठेवी मातीचीच जाण..!

साहेबराव गंगाराम पवार








काव्य वृंदावन

ई-बुक साहित्य

# भक्ती

कवयित्री



सौ. शामला पंडित (दीक्षित)

प्रणाली प्रकाशन, चिंचवड

मृदुंग चिपळी । जयघोष मुखी ॥
वारकरी सुखी । पांडुरंगा ॥ 1 ॥

दिंडी पंढरीची । चालताना वाटे ॥
भक्तीभाव दाटे । अंतरात ॥ 2 ॥

सगुण-निर्गुण । समानता भाव ॥
परमार्थ गाव । वैष्णवांचा ॥ 3 ॥

नाम जप तप । पताका भक्तीची ॥
धारणा शक्तीची । माऊलींची ॥ 4 ॥

पृथ्वी आप तेज । सकळ मंडळी ॥
भेटती राऊळी । विठुराया ॥ 5 ॥

सोहळा संपन्न । पंढरी वारीचा ॥
भिमाई तिरीचा । अद्वितीय ॥ 6 ॥

भाव भोळा हरी । अपूर्वाई वाटे ॥
शामलास दाटे । भक्तीभाव ॥ 7 ॥

सौ. शामला पंडित (दीक्षित)




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

We Create

# IDEAS

for You...




Prasad Dhumal - 8097302653

## SERVICES

- Logo Designing
- Letterheads
- Flex Vinyl Board
- Wedding Album
- 3D Visualization
- Visiting Cards
- Pamplates
- Catalogs
- Photo Editing
- Exhibition Stall
- Corporate gifting and many more....



Grow Your Business with us